केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण जीवन्नोनती अभियानांतर्गत महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवन्नोनती अभियान योजनेकरीता अनुसूचित जाती प्रवर्गाचा सन २०१९-२० या आर्थिक वर्षाचा अखर्चित निधी सन २०२०-२१ च्या अर्थसंकल्पीय निधीतून वितरीत करणेबाबत. तसेच या योजनेस सन २०२०-२१ या आर्थिक वर्षामध्ये अनुसूचित जाती प्रवर्गाचा निधी वितरण करणेबाबत.

केंद्र हिस्सा (लेखाशिर्ष २५०१ए०८४)

राज्य हिस्सा (लेखाशिर्ष २५०१ए०९३)

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२०/प्र.क्र. १७ /अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- १२ ऑक्टोबर, २०२०

**वाचा :-** १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१९/प्र.क्र.६४/अर्थ-३, दि.१६.०४.२०२०

२) केंद्र शासन, ग्रामीण विकास मंत्रालयाचे पत्र क्र.J-१२०२५/०१/२०२०-RL(NRLM__१२B) दि.१०.०४.२०२०

३) ग्राम विकास विभागाची नस्ती क्र.मजिअ-२०२०/प्र.क्र.६७/यो-३

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय ग्रामीण जीवन्नोनती अभियानांतर्गत महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवन्नोनती अभियान या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २५०१ ग्रामविकासासाठी विशेष कार्यक्रम, ०६, स्वयंरोजगार कार्यक्रम, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (०१)एमएसआरएलएम अंतर्गत वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा ६०टक्के) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २५०१ए०८४, ३३-अर्थसहाय्य खाली रु.१४७९०.०० लाख तर (०१) (०२) ) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत अर्थसहाय्य (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २५०१ए०९३, ३३-अर्थसहाय्य खाली रु.७८३६.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील दिनांक १६ एप्रिल, २०२० रोजीच्या परिपत्रकान्वये राज्यात कोरोना विषाणूमुळे उद्भवलेली महामारीची परिस्थिती विचारात घेऊन सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाच्या पहिल्या ३ महिन्याकरिता अनिवार्य व कार्यक्रम खर्चाच्या एकूण वार्षिक अर्थसंकल्पित तरतूदींच्या १५ ते २५ टक्क्याच्या मर्यादेत ठराविक उद्दीष्टांसाठी निधी वितरीत करण्यास मंजूरी देण्यात आली आहे. तसेच केंद्र पुरस्कृत योजनांच्या मागील वर्षामधील निधी वितरणाकरिता वित्त विभागाची सहमती घेणे अनिवार्य केले आहे. या अनुषंगाने ग्राम विकास विभागाच्या संदर्भाधीन नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन व ग्राम विकास विभागाच्या संदर्भाधीन क्र.३ येथील प्रस्तावास अनुसरुन सन २०१९-२० या वर्षातील अखर्चित निधी सन २०२०-२१ करीता अर्थसंकल्पीत तरतूदीतून खर्च करण्यासाठी तसेच या योजनेसाठी सन २०२०-२१ या आर्थिक वर्षाकरिता अर्थसंकल्पीत निधीपैकी (०१) (०१) एमएसआरएलएम अंतर्गत वित्तीय सहाय्य (केंद्र हिस्सा ६०टक्के) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २५०१ए०८४, ३३-अर्थसहाय्य यामध्ये रु.८१३४.५० लाख तर (०१) (०२) ) महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियानांतर्गत अर्थसहाय्य (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २५०१ए०९३, ३३-अर्थसहाय्य याखाली रु.३१३४.४० लाख असा एकूण रु.११२६८.९० लाख इतका निधी प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून अपर मुख्य सचिव (ग्राम विकास विभाग) विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. लॉक डॉऊनमुळे पुढील ३ ते ४ महिने राज्याची आर्थिक स्थिती अतिशय गंभीर स्वरुपाची राहण्याची शक्यता असल्याने सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१६.०४.२०२० रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.२७७/व्यय-१५/२०२०, दि.३०.९.२०२० अन्वये प्राप्त सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२०१०१२१६०८२४३५२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Prashant Pundlik Wagh

Digitally signed by Prashant Pundlik Wagh
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice & Special Assist Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=759e87fbd1e68c290a7221620636ede8425d6a870aa0240f18d726b6c8e6b832, serialNumber=5599270e38b296e5e5d814ff5976561a3ec66d875aeb425d735e1d7c12140929, cn=Prashant Pundlik Wagh
Date: 2020.10.13 12:36:14 +05'30'

**( प्रशान्त पुं. वाघ )**
**कक्ष अधिकरी ,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) अपर मुख्य सचिव (ग्राम विकास विभाग), ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
२) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य ग्रामीण जीवनोन्नती अभियान, ५वा मजला, दक्षिण विंग (एसबीआय साईड) सिडको भवन, सीबीडी बेलापूर, नवी मुंबई-४०० ६१४
३) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
४) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
५) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
६) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
७) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
८) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
९) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग